D:note 8.-ts

१२ भरारी पथकांसाठी असलेल्या १२
वाहनांसाठी वाहन चालकांची पदे
निर्माण करण्यास मंजूरी देणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्र.एमव्हीडी ०५००/सीआर-८५ (१)/परि-४,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,दिनांक : ६ ऑगस्ट, २००३

पहा :- १) शासन निर्णय क्र.एमव्हीडी ०५००/सीआर-८५/परि-४, दि.२६.९.२०००

शासन निर्णय :- मोटार वाहन विभागाने उच्च न्यायालयाच्या दि.१५.१२.९९ च्या आदेशानुसार बृहन्मुंबईत प्रदुषण कमी होण्यासाठी निर्माण केलेल्या १२ भरारी पथकांसाठी खरेदी केलेल्या १२ वाहनांवर प्रत्येकी एक या प्रमाणे १२ वाहन चालकांची मुंबई (मध्य)-५, मुंबई (पश्चिम)-४, मुंबई (पूर्व)-३, या ठिकाणी निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे. संबंधित पदावर नियुक्त होणा-या व्यक्तींना देय असलेले भत्ते नियमानुसार देण्यात यावेत.

२. यावर होणारा खर्च "२०४१-वाहनावरील कर ००१, संचालन व प्रशासन ००१ (दोन) प्रादेशिक कार्यालये ०५, कार्यालयीन खर्च, ह्या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००३-२००४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. आवश्यकता भासल्यास याबाबत सुधारित अंदाजपत्रकात तरतूद करण्यात यावी.

३. सदर निर्णय वित्त विभागाचे सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-७९६/२००३/व्यय-८, दि. १.८.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शा. र. नागवेकर )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रादेशिक परिवहन अधिकारी, मुंबई (मध्य), मुंबई (पश्चिम), मुंबई (पूर्व)
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
गृह विभाग (पोयुडी-१).